**पदोन्नतीसाठी पूर्व अट म्हणून निम्न संवर्गात/सेवेत/श्रेणीत किमान सेवेच्या <u>अनुभवाची अट विहित करणे</u>**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.३५४/१४/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: ५ ऑक्टोबर, २०१५

<u>वाचा</u> :-

1. **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-२००५/प्र.क्र.१/२००५/१२ दिनांक २५ फेब्रुवारी, २००५**
2. **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२००६/प्र.क्र.१७१/०६/१२ दिनांक १७ फेब्रुवारी, २००७**
3. **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.२९०/का.१२ दिनांक १६ जुलै, २०१५**

<u>प्रस्तावना</u> :-

गट "क" (वर्ग-३) पासून गट "अ" (वर्ग-१) मधील सर्व टप्प्यापर्यंतच्या आंतरश्रेणी पदोन्नतीसह प्रत्येक टप्प्यावर पदोन्नती करताना निकटतम निम्न पदावर नियमित तीन वर्षाच्या किमान सेवेची अट पदोन्नतीसाठीची पूर्व अट आहे. त्यानुसार आवश्यक ती तरतूद मंत्रालयाच्या विविध विभागांनी आपापल्या कक्षेतील सर्व पदांच्या सेवाप्रवेश नियमात अंतर्भूत करण्याची कार्यवाही तात्काळ करावी आणि अशा प्रकारे सेवाप्रवेश नियमात सुधारणा होईपर्यंतच्या कालावधीपर्यंत पदोन्नती करताना या तत्वाचा अवलंब करावा अशा सूचना संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

प्रत्येक पदाच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या विचारात घेऊन पदोन्नतीसाठी पूर्व अट म्हणून निम्न संवर्गात/सेवेत/श्रेणीत किमान/कमाल अनुभवाची अट विहित करण्यात येते. विविध संवर्गातील विविध पदांचे सेवाप्रवेश नियम हे भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान केलेल्या प्राधिकाराचा वापर करून प्रसिध्द करण्यात येतात. त्यामुळे सेवाप्रवेश नियमांनुसार पदोन्नतीसाठी निम्न पदावरील किमान सेवेच्या अटीची अंमलबजावणी तंतोतंत होणे आवश्यक आहे.

वरील संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये प्रत्येक टप्प्यावर पदोन्नती देताना निम्न पदावर नियमित ३ वर्षाच्या किमान सेवेची अट विहित केली आहे. ही किमान सेवेची अट त्या पदावरील कमीत कमी किती अनुभव आवश्यक आहे ही बाब विचारात घेऊन विहित केलेली आहे. मात्र अलिकडच्या काळात ही किमान ३ वर्षाच्या सेवेची अट देखील शिथिल करून त्यापेक्षा कमी सेवा कालावधी झालेला असताना पदोन्नती देण्यासाठी विविध विभागांकडून सातत्याने आग्रह धरला जातो आहे व त्याबाबतचे प्रस्ताव दि. १७.०२.२००७ च्या शासन निर्णयांन्वये अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीसमोर सादर करण्यासाठी सातत्याने प्राप्त होत आहेत. परंतु कोणत्याही पदावर पदोन्नती करताना निकटच्या निम्न पदावर किमान ३ वर्षे सेवेची विहित केलेली अट ही मुळातच

किमान सेवा म्हणून अभिप्रेत असल्यामुळे ती आणखी शिथिल करणे सुप्रशासनास बाधक ठरते. या परिस्थितीत सदर ३ वर्षाच्या अटीमध्ये कोणतीही शिथिलता न देण्याबाबतचा आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) "गट क (वर्ग-३) पासून गट अ (वर्ग-१) मधील सर्व टप्प्यांपर्यंतच्या आंतरश्रेणी पदोन्नतीसह प्रत्येक टप्प्यावर पदोन्नती करताना निकटतम **निम्न पदावर किमान ३ वर्षाच्या नियमित सेवेची अट पदोन्नतीसाठी पूर्व अट म्हणून राहील व त्यामध्ये कोणतीही शिथिलता अनुज्ञेय राहणार नाही.**

२) तसेच ज्या पदांच्या सेवाप्रवेश नियमामध्ये पदोन्नतीसाठी निम्न पदांवरील अनुभवाचा किमान कालावधी विवक्षीत कारणास्तव ३ वर्षापेक्षा जास्त विहित केला असेल अशा प्रकरणी निम्न संवर्गात विहित सेवा कालावधी पूर्ण केलेले अधिकारी/कर्मचारी उपलब्ध नसल्यामुळे मोठ्या प्रमाणावर पदे रिक्त राहत असतील तर निम्न संवर्गात आवश्यक किमान सेवेच्या ९० टक्के नियमित सेवा झाल्यानंतर व अनुभवाची अट शिथिल करण्यासाठी संबंधित प्रशासकीय विभागाकडे पुरेसे समर्थन असेल तर **असा उर्वरित सेवा कालावधीची अट शिथिल करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक ३ येथील दि.१६.०७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षेतेखालील समितीसमोर निर्णयार्थ सादर करता येतील."**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१४३९३६९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.10.06 15:00:15 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**

**अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी, सचिव

४.मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,

५.सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६.मा.मुख्य सचिव,
७.सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८.सर्व मंत्रालयीन विभाग,
९.*प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०.*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११.*प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३.*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सवचिालय (विधानसभा), मुंबई,
१४.*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सवचिालय (विधानपरिषद), मंबई,
१५.*सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१७.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१८.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१९.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
२०.*सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कायालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
२१.*प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई ४०० ००१,
२२.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (२ प्रती प्रसिध्दीकरिता),
२३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२५.सर्व विभागीय आयुक्त,
२६.सर्व जिल्हाधिकारी,
२७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२८.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२९.सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३०.सामान्य प्रशासन विभाग/का. ३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरीता),
३१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
३२.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
३३.निवड नस्ती.